**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) रमेश जयराम ढगे, केंद्रप्रमुख**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२४/प्र.क्र.६८/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १३ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. यवतमाळ यांचे पत्र क्र./यजिप/शिविप्रा/आस्था-१/कावि/४०१८/२०२३, दि. १९/०७/२०२३
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/ संकीर्ण/४८९१/२०२४, दिनांक १६/०७/२०२४
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे प्रमाणपत्र क्र.यजिप/शिविप्रा/आस्था-प्राथ/कावि/५५८०/२०२४, दि.२१/१०/२०२४

**ज्ञापन :-**

कै. (श्री.) रमेश जयराम ढगे, केंद्रप्रमुख,जि.प. उ.प्रा. केंद्रीय शाळा, विडुळ, ता. उमरखेड जि. यवतमाळ यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २३/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) ढगे यांच्या पत्नी श्रीमती कुसुम रमेश ढगे यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दि.१४/१०/२०२१ रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे. सबब, कै. (श्री.) ढगे, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यवतमाळ यांनी संदर्भ क्र. (५) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. कै. (श्री.) रमेश जयराम ढगे, केंद्रप्रमुख, जि.प. उ. प्रा. केंद्रीय शाळा, विडुळ, ता. उमरखेड जि. यवतमाळ येथे दिनांक १६/०५/२०१७ पासून कार्यरत होते.

४. जिल्हाधिकारी यवतमाळ तथा अध्यक्ष जिल्हा व्यवस्थापन प्राधिकरण यवतमाळ यांचे दि. ०८/०४/२०२१ च्या आदेशानुसार गट विकास अधिकारी, पंचायत समिती उमरखेड यांनी कै. (श्री.) रमेश जयराम ढगे, केंद्रप्रमुख यांची शासकीय रुग्णालय, उमरेड येथे कोव्हिड-१९ सेंटरवर ग्रामीण भागातून आलेल्या माहितीनुसार व्यक्तीची लक्षणे/सकारात्मक रुग्णांच्या संपर्कात आल्यास तात्काळ चाचणी करणे तसेच त्यांची यादी तयार करणे, संपर्काधीन व्यक्तीची यादी तयार करणे, त्यानुषंगाने तात्काळ वैद्यकीय तपासणीसाठी ग्रामीण रुग्णालयात संपर्क करणे इत्यादी कामाकरिता दिनांक ०९/०४/२०२१ पासून नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती, उमरेड यांनी दिनांक ०९/०४/२०२१ पासून सदर कर्तव्य बजाविण्याकरिता कै. (श्री.) ढगे, यांना कार्यमुक्त केले होते व त्यानुसार त्यांनी कर्तव्याचे पालन केलेबाबत प्रमाणपत्र सादर केले आहे.

५. कै. (श्री.) ढगे, यांची दि. ३०/०४/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली, त्यांचेवर दिनांक २८/०४/२०२१ ते दिनांक २३/०५/२०२१ या कालावधीत भगवती मल्टीस्पेशालिटी हॉस्पीटल, शिवाजीनगर, नांदेड येथे उपचार करण्यात आले. दरम्यान दिनांक २३/०५/२०२१ रोजी कै. (श्री.) ढगे, यांचा कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, भगवती मल्टीस्पेशालिटी हॉस्पीटल, शिवाजीनगर, नांदेड यांनी प्रमाणित केले आहे.

६. कै. (श्री.) ढगे हे मा. जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे दि. ०८/०४/२०२१ चे आदेशास अनुसरुन गट विकास अधिकारी पंचायत समिती उमरेड यांच्या आदेशानुसार कोव्हिड-१९ लसीकरण करुन घेण्याबाबत नागरिकांना प्रोत्साहित करणे कर्तव्याकरिता दिनांक ०९/०४/२०२१ पासून नियुक्ती करण्यात आली होती. कै. (श्री.) ढगे हे उपरोक्त दिनांक ०९/०४/२०२१ च्या आदेशानुसार दिनांक ०९/०४/२०२१ ते दि. २५/०४/२०२१ पर्यंत सदर कोव्हिड कर्तव्यावर कार्यरत असून त्यांची दि.३०/०४/२०२१ रोजी कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असून दिनांक २३/०५/२०२१ रोजी कै. (श्री.) ढगे, यांचा कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाला आहे. त्यानुसार कै. (श्री.) ढगे, हे दवाखान्यात दाखल होण्याअगोदर अथवा मृत्युच्या १४ दिवस अगोदर कोरोना प्रतिबंधात्मक उपाययोजनेसाठी कर्तव्यावर हजर असल्याबाबत श्री. मंदार पत्की, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यवतमाळ यांनी संदर्भ क्र.५ अन्वये प्रमाणित केले आहे.

७. कै. (श्री.) ढगे यांचा दिनांक २३/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबत उपनिबंधक, (जन्म, मृत्यु) नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड यांनी मृत्यु प्रमाणपत्र सादर केले आहे.

८. मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, उमरखेड जि. यवतमाळ यांनी, कै. (श्री.) ढगे यांचे कायदेशीर वारस म्हणून (१) श्रीमती कुसुम रमेश ढगे (२) अक्षय रमेश ढगे (३) मिनाक्षी रमेश ढगे (४) साक्षी रमेश ढगे यांना घोषित केले आहे.

९. कै. (श्री.) रमेश जयराम ढगे, केंद्रप्रमुख, जि.प. उ. प्रा. केंद्रीय शाळा, विडुळ, ता. उमरखेड जि. यवतमाळ यांना २२०२ ३७०८ या लेखाशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथ.) जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी प्रमाणित केले आहे.

१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ व वैद्यकीय अधिक्षक, भगवती मल्टीस्पेशालिटी हॉस्पीटल, शिवाजीनगर, नांदेड यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, उमरखेड जि. यवतमाळ यांनी, कै. (श्री.) ढगे यांचे कायदेशीर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) श्रीमती कुसुम रमेश ढगे (२) अक्षय रमेश ढगे (३) मिनाक्षी रमेश ढगे (४) साक्षी रमेश ढगे यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच/सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. १२१/व्यय-५, दि. ३/०२/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"२२०२-३७०८ या लेखाशीर्षाखाली (०१) (०७) केंद्रीय प्राथमिक शाळांची आस्थापना (अनिवार्य), २२०२ ३७०८/३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)"

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्ष प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करण्यात यावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०२१३१५१८५६८४२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.02.13 15:19:52 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती
४. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), यवतमाळ

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती कुसुम रमेश ढगे, पाटील नगर, टेलिफोन ऑफीस जवळ, ता. उमरखेड जि. यवतमाळ -४४५२०६
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.६८/२०२४)